महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) या संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधीक्षक कृषि अधिकारी) संवर्गात पदोन्नतीबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक: आकृवि २४२३/प्र.क्र.१०८/१५अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: ०१ एप्रिल, २०२५.

**संदर्भ**:- १)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६ब,दि.७/५/२०२१
२) सामान्य प्रशासन विभागाची दि.१४/७/२०२१ रोजीची अधिसूचना

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ, कृषि उपसंचालक या संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ, अधीक्षक कृषि अधिकारी या पदावर नियमित पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीकरीता सन २०२१-२२ आणि सन २०२२-२३ ची निवडसूची तयार करतेवेळी श्री.मदन अभिमान मुकणे यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु असल्याने त्यांचे प्रकरण मोहोरबंद पाकीटात ठेवण्यात आले होते. श्री.मुकणे यांच्याविरुध्द सुरु असलेली विभागीय चौकशी संपुष्टात आल्याने, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५.१२.२०१७ चा शासन निर्णयातील तरतुदीनुसार त्यांचे पदोन्नतीबाबत मोहोरबंद करण्यात आलेले पाकीट उघडण्यात आले असून, विभागीय पदोन्नती समितीने श्री.मुकणे यांची पात्रता तपासून त्यांना सन २०२१-२२ च्या निवडसूचीकरीता अपात्र केले असून, सन २०२२-२३ च्या निवडसूचीकरीता पदोन्नतीसाठी पात्र ठरविले आहे.

त्यानुसार, श्री.मदन अभिमान मुकणे यांना, महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) (वेतनश्रेणी एस-२० : रु.५६१०० - १७७५००) या संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (अधीक्षक कृषि अधिकारी) (वेतनश्रेणी एस-२३ : रु.६७७०० - २०८७००) या संवर्गात सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टिने निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने खालीलप्रमाणे पदस्थापना करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. श्री.मदन अभिमान मुकणे, नोडल अधिकारी, उपसंचालक (कृषि व्यवसाय), स्मार्ट, सोलापूर | खूला | वरिष्ठ कृषि मूल्य साखळी तज्ञ (स्मार्ट), पुणे. (रिक्त पदी) |

२.	उपरोक्त तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**(अ)** सदर तात्पुरती पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून आणि सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त असलेल्या पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहेत.

**(ब)** सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

**(क)** संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ अधीक्षक कृषि अधिकारी पदावरील तात्पुरती पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दिनांक ०१.०८.२०१९ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

**(ड)** सदर अधिकाऱ्यांची महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ अधीक्षक कृषि अधिकारी पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही.

**(इ)** उपरोक्त अधिकाऱ्यांनी त्यांचा सध्याचा पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे. तसेच, पुढील बाबही निदर्शनास आणण्यात येते की, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन अधिसूचना दिनांक २१.०६.२०२१ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात पदोन्नतीच्या पदावर रूजू होणे आवश्यक आहे.

३.	सदर आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४.	आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे पहावे.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०११४४४३४८६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAFULL JAYARAJ THAKUR

Digitally signed by PRAFULL JAYARAJ THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=a667c77bb88ce063662f2aa699e2500c4762f460cf24044d9294538ae9317866, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=270161C25173749823DF5244F6DD301BD627572B61CB43E0B30429B8BA527568, cn=PRAFULL JAYARAJ THAKUR
Date: 2025.04.01 14:46:06 +05'30'

**( प्रफुल्ल ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा)१/२ महाराष्ट्र मुंबई /नागपूर.
६) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) प्रकल्प संचालक, स्मार्ट, पुणे
८) सर्व कृषि संचालक, व्दारा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
९) सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) सर्व कृषि सहसंचालक/सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (द्वारा-आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे)
१२) संबंधित अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे)
१३) निवडनस्ती १५ अे.